**मौजे उसाटणे, ता.अंबरनाथ, जि.ठाणे येथील स.नं. ५०/१ मधील २-२४.८५ हे-आर, स.नं.६२ मधील ८-२८.५६ हे-आर व रस्त्याखालील ०-९७.५७ हे-आर असे एकूण ११-५०.९८ हे-आर शासकीय जमीन उल्हासनगर महानगरपालिकेला घनकचरा व्यवस्थापनासाठी भोगाधिकार मूल्यरहित व महसूल मुक्त देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२७१८/९६०/प्र.क्र.१५८/ज-४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, १ ला मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :१८ सप्टेंबर, २०२०.

**संदर्भ**: १) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग यांचे क्र.मशा/कार्या-१/जमीन-१/प्र.क्र.११७५-टी-४५११९/२०१७, दिनांक ३१/०३/२०१८ चे पत्र.

२) जिल्हाधिकारी, ठाणे यांचे क्र.महसूल/कक्ष-१/टे-१४/बा.को.नं.एफ-१५०६५९५१३२०३८, दिनांक ०९/११/२०१७, क्र.महसूल/कक्ष-१/टे-१४/बा.को.नं.एफ-१५०७०७०७६९१३२२, दिनांक १६/१०/२०१९ व दिनांक १३/०१/२०२० ची पत्रे.

**प्रस्तावनाः-**

आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर यांनी मौजे उसाटणे, ता.अंबरनाथ, जि.ठाणे येथील स.नं. ५०/१ व स.नं. ६२ मधील किमान ३० एकर जमीन घनकचरा व्यवस्थापनासाठी नाममात्र दराने अथवा भोगाधिकार मुल्यरहीत व महसूल मुक्त दराने मिळणेबाबत केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, ठाणे / विभागीय आयुक्त, कोकण यांनी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. उल्हासनगर महानगरपालिकेच्या घनकचरा व्यवस्थापनाच्या अनुषंगाने श्री.राजकुमार कुकरेजा व इतर यांनी मा.राष्ट्रीय हरित लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांच्याकडे मूळ अर्ज क्रमांक ४०/२०१९ दाखल केला आहे. सदर अर्जात मा.राष्ट्रीय रहित लवाद यांनी दिनांक २४ सप्टेंबर, २०१९ रोजी आदेश पारीत केले असून उल्हासनगर महानगरपालिकेला दोन महिन्यात घनकचरा व्यवस्थापनासाठी पुरेशी योग्य जागा उपलब्ध करुन देण्याचे निर्देश जिल्हाधिकारी, ठाणे यांना दिले आहेत.

उल्हासनगर महानगरपालिकेला घनकचरा व्यवस्थापन या सार्वजनिक प्रयोजनासाठी मौजे उसाटणे, ता.अंबरनाथ येथील स.नं. ६२ मधील ८-२८.५६ हे-आर, स.नं. ५०/१ मधील २-२४.८५ हे-आर व रस्त्याखालील ०-९७.५७ हे-आर असे एकूण ११-५०.९८ हे-आर एवढी शासकीय जमीन आवश्यक असल्याने सदर जमीन मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून काढून घेऊन महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६, चे कलम २२अ व कलम ४०, तसेच महाराष्ट्र जमीन महसूल

(सरकारी जमिनीची वितरण करणे) नियम, १९७१ चा नियम ५ मधील तरतूदीनुसार उल्हासनगर महानगरपालिकेला घनकचरा व्यवस्थापन या सार्वजनिक प्रयोजनासाठी भोगाधिकार मूल्यरहित व महसूल मुक्त देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. ह्या संदर्भात दिनांक ०६ सप्टेंबर,२०२० रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचार विनिमय होऊन झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

उल्हासनगर महानगरपालिकेला घनकचरा व्यवस्थापन या सार्वजनिक प्रयोजनासाठी मौजे उसाटणे, ता.अंबरनाथ येथील स.नं. ६२ मधील ८-२८.५६ हे-आर, स.नं. ५०/१ मधील २-२४.८५ हे-आर व रस्त्याखालील ०-९७.५७ हे-आर असे एकूण ११-५०.९८ हे-आर एवढी शासकीय जमीन आवश्यक असल्याने सदर जमीन मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून काढून घेऊन महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६, चे कलम २२अ व कलम ४०, तसेच महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीचे वितरण करणे) नियम, १९७१ चा नियम ५ मधील तरतूदीनुसार उल्हासनगर महानगरपालिकेला घनकचरा व्यवस्थापन या सार्वजनिक प्रयोजनासाठी भोगाधिकार मुल्यरहित व महसूल मुक्त कब्जेहक्काने मंजूर करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती -**

(i) सदर शासकीय जमीन उल्हासनगर महानगरपालिका भोगवटादार वर्ग-२ या धारणाधिकाराने धारण करील.

(ii) विषयांकित शासकीय जमिनीचा वापर केवळ मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी करण्यात यावा.

(iii) शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय सदर जमीन किंवा तिचा कोणताही भाग किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबध विक्री / देणगी देऊन / अदला बदल करुन / गहाण ठेऊन / पट्ट्याने देऊन / खाजगी-सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाह्य यंत्रणाद्वारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरित करणार नाही. सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती / संस्था / कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार अर्जदार संस्थेस करता येणार नाही. तसेच, शासनाच्या महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमिनीचे पोटविभाजन करता येणार नाही.

(iv) प्रस्तावित प्रयोजनाच्या व सुरक्षेच्या अनुषंगाने राज्य व केंद्र शासनाच्या विविध विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश / सूचना या प्रकरणी अर्जदार संस्थेस बंधनकारक रहातील व त्यानुषंगाने आवश्यक खबरदारी / काळजी घेणे बंधनकारक राहील.

(v) विषयांकित शासकीय जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजूर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास करणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त आवश्यकते प्रमाणे अन्य संबधित विभाग / शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्वपरवानगी / ना-हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

(vi) शासकीय जमीन मंजुरीसंदर्भातील इतर नियमित अटी या ठिकाणी लागू राहतील.

(vii) वरील अटी / शर्तीपैकी कोणत्याही अटी / शर्तीचा भंग केल्यास शर्तभंगाबाबत सदर शासकीय जमीन शासनजमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

(viii) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग/ जिल्हाधिकारी, ठाणे यांना आवश्यक वाटतील अशा अन्य सुसंगत अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

सदर शासन निर्णय नगर विकास विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाशी विचारविनिमय करून त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७६/२०२०/व्यय-९, दि.३१.०३.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२००९१८१५३७३०३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=704cb545c50221b15cde7ccb8854e694c765dfb3a0240e891ebfb56ee79e3440, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2020.09.18 15:40:33 +05'30'

**(अजित देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
८) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

९) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

११) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.

१२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१३) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विकाअ, मंत्रालय, मुंबई -३२.

१४) अपर मुख्य सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुबई-३२.

१५) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुबई-३२.

१६) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुबई-३२.

१७) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.

१८) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, नवी मुंबई.

१९) जिल्हाधिकारी, ठाणे.

२०) आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर, जि.ठाणे.

२१) मा.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य (१), मुंबई -३२.

२२) मा.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य (२), नागपूर-३२.

२३) निवडनस्ती, कार्यासन ज-४, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.